**अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक शाआशा-२००८/प्र.क्र.८१/का-१३**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२**
**दिनांक :- २८ ऑगस्ट, २००९.**

**<u>प्रस्तावना :-</u>** महाराष्ट्र राज्यातील अनुसूचित जमातीची लोकसंख्या ८५.७७ लक्ष (एकूण लोकसंख्येच्या ८.८५ टक्के ) आहे. महाराष्ट्र राज्यात अनुसूचित जमातीतील साक्षरतेचे प्रमाण ५२.२ टक्के (पुरुष ६७ टक्के व स्त्रिया ४३.१ टक्के) आहे. उच्च शिक्षणात प्रामुख्याने इंग्रजीचा वापर जास्त होत असल्याने अनुसूचित जमातीचे विद्यार्थी उच्च शिक्षणात मागे पडत आहेत व उच्च शिक्षणाच्या बदललेल्या वातावरणात त्यांना जुळवून घेणे कठीण होत आहे. जागतिकीकरणाच्या सध्याच्या वातावरणात इंग्रजीचे महत्त्व वाढत असून अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांचा कल इंग्रजी माध्यमाकडे थोडया प्रमाणात वाढत असला तरी शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित शाळेत शिक्षण घेणे त्यांच्या आर्थिक कुवतीपलीकडे आहे. यासाठी अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इंग्रजी माध्यमातून शिक्षण घेण्याच्या संधी मोठया प्रमाणात उपलब्ध करुन देणे आवश्यक झाले आहे. या पार्श्वभूमीवर अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये शिक्षण देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत मंत्रीमंडळाच्या मान्यतेने शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**<u>शासन निर्णय</u> :-** अनुसूचित जमातीच्या २५०० विद्यार्थ्यांना दरवर्षी जवळच्या शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांमध्ये इयत्ता पहिली पासून इयत्ता बारावी पर्यंत शिक्षण देण्यास शासन मान्यता देत आहे. त्यासाठी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी सभोवतालच्या गावांतील इयता पहिलीत प्रवेश घेण्यास पात्र असलेल्या विद्यार्थ्यांची जाहीर सूचनेद्वारे माहिती मागवावी. विद्यार्थ्यांच्या पालकांना प्रस्तुत योजनेचा हेतू व फलनिष्पतीबाबत माहिती देण्यात यावी. तसेच प्रत्येक शासकीय/ अनुदानित शाळांच्या पातळीवर, प्रस्तुत योजनेचा लाभ घेऊ इच्छिणा-या मुलांची यादी, प्रवेश अर्ज व पालकांचे संमती पत्र घेण्यात यावेत. तद्नंतर प्रत्येक प्रकल्प अधिका-याने किमान १०० विद्यार्थ्यांची निवड करावी व निवड झालेल्या विद्यार्थ्यांना जवळच्या शहरांतील इंग्रजी माध्यमाच्या निवासी शाळेत प्रवेश मिळवून देण्याबाबत आवश्यक ती सर्व कार्यवाही पार पाडावी.

२. इंग्रजी माध्यमाच्या नामांकित निवासी शाळांची निवड करण्यासाठी तसेच शाळेचे शुल्क ठरविण्यासाठी खालीलप्रमाणे सचिव स्तरीय समिती स्थापन करण्यात येत आहे :-

१) प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग - अध्यक्ष.
२) प्रधान सचिव, वित्त विभाग - सदस्य.
३) सचिव, शालेय शिक्षण विभाग - सदस्य.

३. वरील योजनेच्या अटी व शर्ती खालीलप्रमाणे राहतील :-

(१) सदर योजनेचा लाभ घेऊ इच्छिणारा विद्यार्थी अनुसूचित जमातीचा असावा.

(२) विद्यार्थ्याच्या पालकाने विद्यार्थ्याच्या नावे सक्षम अधिका-याने दिलेल्या अनुसूचित जमातीच्या दाखल्याची साक्षांकित प्रत सादर करावी. सदर प्रतीची मूळ प्रमाणपत्रासोबत तपासणी करण्यात यावी व ती प्रत बरोबर असल्याची खात्री करुन घेण्यात यावी.

(३) जर विद्यार्थी दारिद्रयरेषेखालील असेल तर त्यासंबंधीच्या यादीतील अनुक्रमांक नमूद करण्यात यावा.

(४) या योजनेचा लाभ घेऊ इच्छिणा-या मुलांच्या पालकाच्या कुटुबांची वार्षिक उत्पन्नाची कमाल मर्यादा रु. १.०० लाख इतकी राहील.

(५) इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये आदिवासी विद्यार्थ्यांची स्वतंत्र तुकडी न करता त्यांना इतर मुलांसोबत एकत्रित शिक्षण देण्यात यावे.

(६) निवासी शाळेत राहणा-या विद्यार्थ्यांना वर्षातून दोनदा पालकांना भेटण्यासाठी स्वग्रामी जाण्याकरिता प्रवास खर्च देण्यात यावा. तसेच वर्षातून दोनदा पालकांना आपल्या पाल्यांना शाळेत येऊन भेटण्याकरिता प्रवास खर्च देण्यात यावा. सदर प्रवास खर्च अदा करण्याची जबाबदारी संबंधित प्रकल्प अधिका-यांची राहील.

(७) विद्यार्थ्यांच्या निवासाची व्यवस्था वेगवेगळी न करता इतर मुलांसोबत एकत्रित करण्यात यावी.

४. आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांची तसेच विधवा/घटस्फोटीत/निराधार/परित्यक्ता व दारिद्रय रेषेखालील कुटुंबातील अनुसूचीत जमातीच्या विद्यार्थ्यांची प्राधान्याने निवड करुन त्यांना नामांकित शाळांमध्ये प्रवेश मिळवून देण्यात यावा.

५. नामांकित शाळांची यादी तयार करण्यासाठी शाळेची स्थापना कधी झाली, शाळेत देण्यात येणा-या सोयी-सुविधा, शाळांचे मागील तीन वर्षांचे निकाल तसेच त्यांचे मागील ३ वर्षांचे बँक स्टेटमेंट, शाळांमध्ये अभ्यासक्रमाव्यतिरिक्त शिकविण्यात येणा-या इतर बाबी, मागील ३ वर्षाचे लेखा परिक्षण अहवाल, शालेय शिक्षण पूर्ण केल्यानंतर त्या शाळेतील विद्यार्थ्यांनी केलेली प्रगती अथवा घेतलेले व्यावसायिक शिक्षण इ. बाबींची माहिती विचारात घेवून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, हे सचिव स्तरीय समितीस प्रस्ताव सादर करतील. सदर समितीने उत्तम नामांकित शाळांची निवड करावी व त्यानुसार प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांनी विद्यार्थ्यांच्या व त्यांच्या पालकांच्या आवडीनुसार/प्राधान्यानुसार संबंधित विद्यार्थ्यांस नामांकित शाळेत इयत्ता १ली मध्ये प्रवेश मिळवून द्यावा.

६. नामांकित शाळेच्या नियमानुसार विद्यार्थ्यांसाठी शालेय गणवेश, वहया, पुस्तके, बुटमोजे, रेनकोट, अंडर गारमेंट्स, भोजन, निवास खर्च, टयुशन फी, प्रवेश फी, सुरक्षा अनामत, शिक्षण शुल्क इत्यादींसाठी देय रक्कम संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, यांच्यामार्फत संबंधित नामांकित निवासी शाळेस अदा करण्यात यावी. सदरचे शुल्क, संबंधित विद्यार्थी इयता १२ वी पास होईपर्यन्त देय राहील. मात्र सदर विद्यार्थी दरवर्षी उत्तीर्ण होणे आवश्यक राहील. विद्यार्थी अनुत्तीर्ण झाल्यानंतर त्याला नामांकित शाळेतून काढून टाकण्यात यावे. विद्यार्थ्यांची देखभाल, शिक्षण, आरोग्य व प्रगती यांची संपूर्ण जबाबदारी संबंधीत नामांकित शाळेची राहील. सदर योजनेची योग्य अंमलबजावणी करुन योजना सफल करण्याची जबाबदारी संबंधित प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त, आदिवासी विकास यांची राहील. समितीद्वारे नामांकित शाळांची अंतिम निवड झाल्यानंतर निवड झालेल्या शाळेबरोबर रीतसर करारनामा करण्यात यावा.

७. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी उपरोक्त योजना राबविण्यासाठी आवश्यक ती सर्व कार्यवाही तात्काळ करावी. सदर योजनेची अंमलबजावणी सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांचेमार्फत करण्यात येईल. प्रत्येक प्रकल्प अधिकारी १०० विद्यार्थी दरवर्षी या योजनेसाठी निवड करुन नामांकित शाळेत पाठवतील. सदर योजनेचे नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी व अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती यांनी पर्यवेक्षकीय अधिकारी म्हणून जबाबदारी पार पाडावी. सदर योजना सन २००९-२०१० पासून पुढे चालू राहील.

८. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१३६/०९/व्यय-१४,दिनांक १६/५/२००९ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०८२८१२४१११००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

( ग.गो.पंचभाई )
शासनाचे सह सचिव

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव, राजवभवन, मलबार हिल, मुंबई
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
मा. उप मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
शिक्षण संचालक (उच्च शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे,
महालेखापाल (लेखा व परिक्षा ) महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञयेता ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक (५ प्रती).
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
विभागीय आयुक्त, नाशिक/पुणे/औरंगाबाद/नागपूर
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
विभागीय शिक्षण सह संचालक, नाशिक/पुणे/औरंगाबाद/नागपूर
वित्त विभाग (व्यय-१४/अर्थसंकल्प-१७), मंत्रालय, मुंबई.
मा. प्रधान सचिव आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग,
निवड नस्ती, (कार्यासन-१३)आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

--------